वय,राष्ट्रीयत्व व अधिवास प्रमाणपत्र देण्याचे काम
जिल्हाधिकारी /जिल्हा दंडाधिकारी,मुंबई व मुंबई
उपनगरे यांच्या कार्यालयाकडे वर्ग करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र.एमआयएस २०१०/प्रक्र.३००/विदेशी-२,**
**मंत्रालय,मुंबई-३२, दिनांक ५ ऑक्टोबर, २०१०**

**वाचा -**

१) शासन निर्णय, राजकीय व सेवा विभाग,मुंबई राज्य क्रमांक १५८६/३४-III, दि.१ नोव्हेंबर,१९४०
२) शासन निर्णय, राजकीय व सेवा विभाग,मुंबई राज्य क्रमांक डीएमयू १०५३-एच, दि.८.१०.१९५३,
३) शासन निर्णय, राजकीय व सेवा विभाग,मुंबई राज्य क्रमांक सीटीझेड १०८५-अ, दि.३० मार्च,१९५७
४) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई क्रमांक सीटीझेड-४४/७०-अ, दि.२१.४.१९७०
५) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई क्रमांक.डीएमसी १०८७/९६९८/ /६०८-बत्तीस, दि.१ मार्च १९८९

**प्रस्तावना-**

राजकीय व सेवा विभाग, मुंबई राज्य यांच्या शासन निर्णय, क्रमांक १५८६/३४-III, दि.१ नोव्हेंबर,१९४०अन्वये अधिवास प्रमाणपत्र देण्याबाबतचे अधिकार अतिरिक्त मुख्य महानगर दंडाधिकारी व इतर महानगर दंडाधिकारी यांना प्रदान करण्यात आले आहेत. त्यानंतर न्यायिक व कार्यकारी विभाग वेगळे झाल्याने, शासन निर्णय, राजकीय व सेवा विभाग, मुंबई राज्य यांच्या क्रमांक डीएमयू १०५३-एच, दि.८.१०.१९५३ अन्वये अधिवास प्रमाणपत्र जारी करण्याचे काम जिल्हाधिकारी/जिल्हा दंडाधिकारी यांना प्रदान करण्यात आले. तथापि बृहन्मुंबईसाठी हे कामकाज अतिरिक्त मुख्य महानगर दंडाधिकारी व इतर महानगर दंडाधिकारी,मुंबई यांच्या मार्फतच चालू ठेवण्यात आले आहे.

अधिवास प्रमाणपत्र प्रदान करण्याचे कामकाज बृहन्मुंबईतील जिल्हाधिकारी/जिल्हा दंडाधिकारी यांच्याकडे वर्ग करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासन आता पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णय -**

बृहन्मुंबई जिल्हयाकरिता वय, राष्ट्रीयत्व व अधिवास प्रमाणपत्र जारी करण्याचे कामकाज अतिरिक्त मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई व इतर महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या ऐवजी जिल्हाधिकारी/जिल्हादंडाधिकारी मुंबई शहर व मुंबई उपनगरे यांच्याकडे दि. १ जानेवारी,२०११ पासून सोपविण्यात येत आहे.

प्रस्तुत शासन निर्णय महसूल व वन विभाग आणि विधी व न्याय विभाग च्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

५-१०-२०१०

**(सुनिल बा.रावडे)**
**कक्ष अधिकारी,गृह विभाग**

प्रत-
मा.राज्यपाल यांचे सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव,
मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,(पत्राद्वारे)
महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राद्वारे)
मुख्य महानगर दंडाधिकारी, एस्प्लनेड, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र १, (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी,
संचालक,शासकीय मुद्रण व लेखन सामुग्री संचालनालय,मुंबई,
निवडनस्ती.

----------